# गवळीण आणि तिचीबादली

कैरल बार्नेट
मराठी : अश्विनी बर्वे



# गवळीण आणि त्याची बादली



मराठी : अश्विनी बर्वे

कैरल बार्नेट

प्रिय मुलांनो,

तुम्ही दुधाच्या बादलीपासून एखादा पोषाख करू शकतो का? या कहाणीची नायिका गवळीणीने विचार केला की ती असं करू शकते. तुम्हांला हे शक्य वाटतं का? कहाणी वाचा आणि माहित करून घ्या. मला माहित आहे की तुम्हांला ही कहाणी खूप आवडेल.



मार्शा एक गवळीण होती. ती एका मोठ्या शेतावर राहत असे, जे एका गावाच्या बाहेर होते. ती गायांचे दूध काढत असे.

ती कोंबड्याना दाणा ही घाले आणि
त्यांची अंडी गोळा करत असे आणि
घोड्यांचे केस विंचरत असे.

मार्शाला शेतावर राहायला
आणि काम करणे आवडत असे.



तिला स्वप्नं बघायला आवडत असे. तिने भव्य महाल, सुंदर नवयुवक आणि अनेक सुंदर वस्तूंबाबत स्वप्नं पाहिली होती.



सगळ्यात जास्त, मार्शाने एका नव्या पोशाखाचे स्वप्नं पहिले-एक खूप खास पोशाखाबाबत. तो जगातला सगळ्यात सुंदर पोशाख होता.

तिने डिसेंबरमध्ये ख्रिसमस नृत्याच्या वेळी हा सगळ्यात सुंदर पोशाख घालण्याची योजना तयार केली.



“असा पोशाख खरेदी करण्यासाठी तुला खूप साऱ्या पैशांची गरज लागेल,” तिचे मित्र तिला म्हणाले.

“ते पैसे तुला कुठून मिळतील?”

“तुम्ही लोक त्याबाबत चिंता करू नका!” मार्शा म्हणाली. “माझ्याकडे पैसे जमा करण्याची एक योजना आहे.”



दुसऱ्या दिवशी मार्शा खूप लवकर उठली आणि गोठ्यात गेली.

"नमस्ते, बेसी," तिने गायीला म्हटलं. “तू खूप भाग्यवान आहे. तू जगातला सगळ्यात सुंदर पोशाख खरेदी करण्यासाठी मला मदत करशील का?”





"तो एक फिकट निळा पोशाख असेल, ज्याला पांढऱ्या रंगाची झालर असेल. मी तो ख्रिसमस नृत्याच्या वेळी घालेन आणि मग मी पार्टीत सगळ्यात सुंदर मुलगी होईल.

तसा पोशाख खरेदी करण्यासाठी मला खूप साऱ्या पैशांची गरज लागेल. बेसी, तू ते पैसे गोळा करण्यासाठी मला मदत करशील. बरं, बेसी तू याबाबत काय विचार करते?



“तू काय म्हणालीस?”
मार्शाने गायीला विचारलं.

“हम्मा-हम्मा ," बेसी म्हणाली.

“आधी मी या बादलीतले दूध विकेन. त्या दुधाचे पैशांनी मी एक कोंबडा आणि दोन कोंबड्या खरेदी करेन. त्या कोंबड्यांना खूप सारी पिल्लं होतील. ती पिल्लं मोठी होऊन मोठ-मोठ्या कोंबड्या होतील.”



“मी त्या जाडजूड कोंबड्यांना यात्रेत विकेन.”

“मी यात्रेत पाळण्यासाठी काही खर्च करणार नाही. मी कॅन्डी, केक आणि फुग्यांवर सुद्धा एकही पैसा खर्च करणार नाही. मी यात्रेत काहीच खरेदी करणार नाही.”





“मी जगातला सुंदर पोशाख खरेदी करण्यासाठी आपले सगळे पैसे वाचवेन. त्या निळ्या पोशाखाला सुंदर मोठी पांढरी झालर लावलेली असेल.”



“मी तो ड्रेस घालेल – मी जगातला सगळ्यात सुंदर ड्रेस ख्रिसमस नृत्य करतांना घालेल.”

“आधी, मी माझे केस कुरळे करेन. मग माझा ड्रेस घालेन आणि गळ्यात एक किंमती हार घालेन. मग मी कितीतरी सुंदर दिसेन.”



“ख्रिसमस नृत्य करतांना प्रत्येकजण माझ्याकडे एकटक बघेन आणि म्हणेल, “ज़रा मार्शा कडे बघा! ती त्या सुंदर ड्रेसमध्ये किती अद्‌भुत दिसते आहे. तिला तो अतुलनीय पोशाख कुठे मिळाला?”



“त्या पार्टीत मला माझ्या जीवनातली सगळ्यात जास्त मजा येईल. मी नाचेन, गायीन, पिईन आणि रुचकर जेवण जेवेन.”

“जेव्हा संगीत सुरु होईन तेव्हा सर्व तरुणांना माझ्याबरोबर नाच करावा वाटेल. आत्ता नाही, मी त्यांना म्हणेन. कदाचित नंतर मी तुमच्याबरोबर नाच करेन.”





"तरीही सगळे तरुण माझ्यासाठी आपापसांत एक-दुसऱ्याशी भांडतील. त्यांना सर्वांना माझ्याबरोबर नृत्य करावे वाटेल.पण मी त्यांच्यातल्या केवळ एकाच बरोबर नृत्य करेन.”

“तो पार्टीतला सगळ्यात छान दिसणारा तरुण असेल. मी त्याला गोड आवाजात म्हणेन, “तुम्हांला माझ्याबरोबर नृत्य करायला आवडेल का?”



“तो तरुण हसेल आणि उत्तर देईल, “नक्कीच मला तुमच्याबरोबर नृत्य करायला आवडेल. तुम्ही या ख्रिसमस पार्टीच्या शान आहात.”





“आम्ही एकदा, दोनदा, तीनदा नाचू.
नाही, आम्ही रात्रभर नाचू.”

मग मार्शाने आपले डोळे मिटले आणि ती अजून स्वप्नं बघू लागली. तो ख्रिसमस पार्टी मध्ये होती, आणि ती एका सुंदर तरुणाबरोबर नृत्य करत होती. ती नाचत राहिली, नाचत राहिली, नाचत राहिली. तिने संगीताच्या तालावर टाळी वाजवली.





संगीताचा वेग वाढत वाढत गेला. मग मार्शापण वेगाने आजून वेगाने नृत्य करू लागली. मार्शाला बघून सगळे प्राणी घाबरून गेले. त्यांना भीती वाटत होती की ती पडेल याची.



पण मार्शा थांबली नाही. ती सतत नाचत राहिली.



... ती वेगाने, अजून वेगाने नाचत राहिली.



अचानक, ती एका दगडावरून घसरली, आणि तिची दुधाची बादली जमिनीवर पडली.



आणि मार्शा स्वतः ही जमिनीवर पडली.



“आता माझ्याजवळ जगातला सगळ्यात सुंदर ड्रेस खरेदी करण्यासाठी पैसे नसतील.”



“माझी योजना बरबाद झाली!” ती दुःखाने ओरडली. “आता मी दूध विकू शकणार नाही. मी एक कोंबडा आणि दोन कोंबड्या खरेदी करू शकणार नाही, आणि मी पिल्लं पाळून त्यांना जाडजूड नाही करू शकत.”

मार्शा खूप दुःखी होती, पण ती एक गोष्ट शिकली: “कोंबड्या जन्माच्या आधीच मोजू नका!”



समाप्त